**राष्ट्रीय सहकार विकास निगम कडून मंजूर प्रस्तावांना मासळीचे सुरक्षण, परिवहन व पणन योजनेअंतर्गत सन २०१५-१६ या वर्षात निधी बी.डी. एस. प्रणालीवर उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि -१११५/प्र.क्र.१३३/पदुम-१४,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.**
**तारीखः १ जून, २०१५**

वाचा :-

आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्र. मत्स्य/सां /०६११०१/२०१५-१६, दिनांक २२.५.२०१५

प्रस्तावना :-

राष्ट्रीय सहकार विकास निगममार्फत (एनसीडीसी) अंतर्गत मच्छिमार सहकारी संस्थांना बर्फ कारखाने व शीतगृह उभारणे, मासळीचे जलद वाहतुक करण्यासाठी ट्रक, टेम्पो खरेदी करणे, डिझेल टँकर खरेदी करणे, गोदामांचे बांधकाम करणे इत्यादीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन १९७७-७८ पासून कार्यान्वीत करण्यात आली आहे. याकरिता राष्ट्रीय सहकार विकास निगमाने विहित केलेल्या आकृतीबंधाप्रमाणे शासन निर्णय क्रमांक : एनसीडीसी-२७८७/७२७१/सीआर ४२/फिश- २, दिनांक २८ मार्च, १९८८ अन्वये राज्य शासनाकडून मच्छिमार सहकारी संस्थांना द्यावयाच्या अर्थसहाय्य मंजूरीस रा.स.वि.नि. कडून मान्यता प्राप्त आहे. या संस्थेस चालू वित्तीय वर्षात रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय सहकार विकास निगम योजनेअंतर्गत मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण करणे यासाठी मच्छिमारांना अर्थसहाय्य मंजूर करताना शासन निर्णय क्रमांक: एनडीसी-२७८७/ ७२७१/ सीआर-४२/ फिश-२, दिनांक २८ मार्च, १९८८ अन्वये मासळीचे सुरक्षण, परिवहन व पणन या योजनेअंतर्गत राष्ट्रीय सहकार विकास निगम योजनेखाली सोबतच्या प्रपत्र-अ मधील संस्थेस अर्थसहाय्य करीता रु. ३,२१,०६,०००/- ( अक्षरी तीन कोटी एकवीस लाख सहा हजार फक्त ) इतका निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. तथापि निधी खर्च करण्यापूर्वी शासन निर्णयातील अटींची पूर्तता केल्याची खात्री करावी.

२. यासाठी सहाय्य आयुक्त, मत्स्यव्यवसाय, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम वितरीत करताना योजनेच्या अटी व शर्तीची पूर्तता झाली असल्याची खात्री करावी.

३. याकरीता होणारा खर्च सन २०१५-१६ च्या मंजूर अनुदानातून खालील नमूद केलेल्या लेखाशिर्षातून करण्यात यावा.

१) ४४०५-मत्स्यव्यवसायावरील भांडवलील खर्च
(००) १९५-सहकारी संस्थांना मदत
पंच वार्षिक योजनांतर्गत योजना
(०१) ((०५) जतन वाहतुक व पणन
रा. स.वि. म. हिस्सा ( ४४०५ ०१७७)
३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान रु. ६३,००,०००/-

२) ४४०५, मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च
(०१) १९५, सहकारी संस्थांना मदत
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०१) )११) जतन, वाहतूक व पणन बर्फ कारखाने, शितगृह
रा.स.वि.म.हिस्सा (४४०५ ०५६२)
३५-भांडवली मत्तेचया निर्मितीकरीता अनुदान रु. २,५२,००,०००/-

३) २४०५, मत्स्यव्यवसाय
(०२) (२०) मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था
पंच वार्षिक योजनांतर्गत योजना
(०२) (०५)-जतन, वाहतूक व पणन ( राष्ट्रीय सहकार विकास महामंडळ )
(२४०५ ०३८९ )
३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान रु. २,३६,०००/-

४) ४४०५, मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च
(००) १९५-सहकारी संस्थांना मदत
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०१) ( १२) जतन वाहतूक व पणन- ट्रक, वाहने, डिझेल टँकर खरेदी विक्री व
गोदाम बांधणी (रा.स.वि.म.हिस्सा ) ( ४४०५ ०५७१)
३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान रु. ३,७०,०००/-

एकूण रु. ३,२१,०६,०००/-

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/ अर्थ-३, दिनांक १७.४.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२१६५११२३९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nitin Madhavrao Pawar

Digitally signed by Nitin Madhavrao Pawar
DN: CN = Nitin Madhavrao Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.06.04 16:45:28 +05'30'

**नितीन पवार**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२ जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, ठाणे
३ प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
४ सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, ठाणे
५ महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
६ जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई / ठाणे
७ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९ कक्ष अधिकारी, पदुम-१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१० निवड नस्ती, पदुम-१४

प्रत माहितीकरिता, सचिव ( पदुम) यांचे स्वीय सहाय्यक

शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक: मत्स्यवि-१११५/प्र.क्र.१३३/ पदुम-१४
दिनांक १ जून, २०१५ चे सोबतचे विवरणपत्र-अ

( रुपये लाखात )

| अ.क्र. | संस्था | ५% भागभांडवल (४४०५०१७७) | २०% खास विमोचक भागभांडवल (४४०५०५६२) | १०% खास विमोचक भागभांडवल (२४०५०३८९) | १५% खास विमोचक भागभांडवल (२४०५०५७१) | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | ससून डॉक मत्स्योद्योग सह. सो. ससून डॉक | ६३.०० | २५२.०० | - | - | ३१५.०० |
| २ | माहूल मत्स्यव्यवसाय सह. सेवा संस्था मर्या. माहूल | - | - | २.३६ | ३.७० | ६.०६ |
| | | | | | एकूण | ३२१.०६ |